

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२.

---

क्रमांक- आरएलपी- ०३२२/प्र.क्र.५०/विशा- १ ब दिनांक- १७ मार्च, २०२२.

## परिपत्रक

## होळी, धुलिवंदन व रंगपंचमी- २०२२ मार्गदर्शक सूचना.

या वर्षी दि. १७ मार्च रोजी होळी, १८ मार्च रोजी धुलिवंदन व २२ मार्च, २०२२ रोजी रंगपंचमी हे सण साजरे करण्यात येणार आहेत. कोविड- १९ मुळे गेल्या दोन वर्षांपासून सर्व धर्मिय सण, उत्सव तसेच विविध कार्यक्रम नागरिकांनी मोठ्या प्रमाणात एकत्र न येता, शक्यतोवर घरातच राहून साजरे केले आहेत. कोरोनाचे संक्रमण अद्याप सुरु असल्यामुळे होळी, धुलिवंदन व रंगपंचमी उत्सव नागरिकांनी मोठ्या प्रमाणात एकत्र येऊन अथवा गर्दी करुन साजरे न करता स्वत:च्या व इतरांच्या आरोग्याच्या दृष्टीकोनातून काळजी घेऊन साजरे करणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने खालील मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत:-

१. महाराष्ट्र शासन महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभागाचे परिपत्रक क्र.- DMU/२०२०/CR.९२/DisM-१, दि. १ मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोर पालन करावे.
२. होळी/शिमगा हा सण संपूर्ण महाराष्ट्रात मोठ्या उत्साहात साजरा केला जातो. यावर्षी दि. १७ मार्च, २०२२ रोजी होळीचा सण आहे. कोविड संक्रमणामुळे हा सण शक्यतोवर गर्दी न करता कोविड अनुरुप वर्तणूक (Covid Appropriate Behaviour) नियमांचे पालन करुन साजरा करावा.
३. दि. १८/३/२०२२ रोजी धुलिवंदन व २२/३/२०२२ रोजी रंगपंचमी हे सण साजरे करण्यात येणार आहेत. या सणानिमीत्ताने एकमेकांवर रंग टाकणे, पाणी टाकणे, एकमेकांना गुलाल लावून रंगाची उधळण करण्यात येत असते. परंतु कोविड- १९ चा प्रादुर्भाव वाढू नये यासाठी धुलिवंदन व रंगपंचमी हे सण साधेपणाने साजरे करावेत.
४. होळी/शिमगा सणा निमित्ताने (विशेष करुन कोकणात) पालखीची मिरवणूक काढण्यात येते. परंतू यावर्षी देखील पालखी घरोघरी न नेता स्थानिक मंदिरातच दर्शनाची व्यवस्था होईल याकरीता स्थानिक प्रशासनाने उपाययोजना कराव्यात. तसेच त्याठिकाणी गर्दी होणार नाही व कोविड अनुरुप वर्तणूक (Covid Appropriate Behaviour) नियमांचे तंतोतंत पालन होईल याकडे सर्वतोपरी लक्ष देऊन योग्य ती दक्षता घ्यावी.
५. कोविड- १९ चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासनाच्या मदत व पुनर्वसन, आरोग्य, पर्यावरण, वैद्यकीय शिक्षण विभाग तसेच संबंधित महानगरपालिका, पोलीस प्रशासन, स्थानिक प्रशासन यांनी विहित केलेल्या नियमांचे काटेकोर पालन करावे. तसेच या परिपत्रकानंतर व प्रत्यक्ष सण सुरु होण्याच्या मधल्या कालावधीत अजून काही सूचना प्रसिध्द झाल्यास त्यांचे देखील अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०३१७१२५२०६३८२९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2022.03.17 12:53:15 +05'30'

**(संजय खेडेकर)**
**उप सचिव, गृह विभाग.**

प्रत माहिती तथा आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. महापौर, महानगर पालिका.
१२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१६. सचिव व महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७. सर्व आयुक्त, महानगर पालिका.
१८. सर्व पोलीस आयुक्त.
१९. सर्व जिल्हाधिकारी.
२०. सर्व पोलीस अधीक्षक.
२१. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका.
२२. निवडनस्ती.